**राज्य क्षेत्रातील योजना**

गळनिंब, शिरसगांव व इतर १८ गांवे प्रादेशिक पाणी पुरवठा योजना, ता. नेवासा जि. अहमदनगर या योजनेच्याअंदाजपत्रकास व आराखडयास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,
शासन निर्णय क्र, ग्रापापु-२००८/प्र.क्र.११०/पापु-०९
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- २९ ऑगस्ट २००९.

संदर्भ:- १. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,
क्र.ववेका/१०९८/सीआर/४३७(अ)/पापु-१०,दि.२.४.१९९८
२. शासन पत्र क्र बैठक २००७/ प्र.क्र.३२३/पा.पु.०६ दि. ७/२/२००८

**प्रस्तावना:-**

गळनिंब, शिरसगांव व इतर १८ गांवे प्रादेशिक पाणी पुरवठा योजना, ता. नेवासा जि. अहमदनगर या पाणी पुरवठा योजनेच्या रु. १५५२.२२ लाख ढोबळ खर्चाच्या अंदाजपत्रकास संदर्भीय शासन निर्णय क्र. १ अन्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. तथापि, काही अपरिहार्य कारणांमुळे योजनेच्या खर्चात रु. ६५४.७७ लाखाने वाढ झाली. सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यासाठी स्थापन करण्यात आलेल्या राज्य स्तरावरील छोटया गटाच्या दि. १४ व १५ फेब्रुवारी २००७ च्या बैठकीत, शिफारस केल्यानुसार गळनिंब, शिरसगांव व इतर १८ गांवे प्रादेशिक पाणी पुरवठा योजना, ता. नेवासा जि. अहमदनगर या पाणी पुरवठा योजनेस सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

वरील बाब विचारात घेऊन गळनिंब, शिरसगांव व इतर १८ गांवे प्रादेशिक पाणी पुरवठा योजनेच्या रु.६५४.७७ लाख (रुपये सहा कोटी चोपन्न लाख सत्याहत्तर हजार फक्त) या वाढीव खर्चासह सोबतच्या प्रपत्रात दर्शविल्यानुसार रु. २२०६.९९ लाख (रुपये बावीस कोटी सहा लाख नव्याण्णव हजार फक्त) इतक्या सुधारित किमतीस प्रशासकीय मंजुरी प्रदान करण्यात येत आहे.

१. ही योजना महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत कार्यान्वित करण्यात येईल.

२. या योजनेच्या मूळ प्रशासकीय मंजुरी दिलेल्या निर्णयात ज्या सूचना दिलेल्या आहेत, त्याचे काटेकोरपणे पालन करावे. तसेच मूळ शासन निर्णयात ज्या अटी व शर्ती दिल्या आहेत त्या कायम राहणार असून त्याचेही पालन करण्यांत यावे.

३ सदर योजना पूर्ण झाल्यावर ती संबंधीत जिल्हा परिषदेच्या ताब्यात देण्यात यावी. संबंधीत कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा बांधकाम विभाग, जिल्हा परिषद यांच्याकडून योजना प्रत्यक्षात पूर्ण झाली आहे, या आशयाची सूचना मिळाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत योजना ताब्यात घेण्यासंबंधी संबंधीत ग्रामपंचायत / जिल्हापरिषद जबाबदार राहील. योजना प्रत्यक्षात पूर्ण झाल्यावर लगेच संबंधित कार्यकारी अभियंता, जिल्हापरिषद व संबधित ग्रामपंचायतीच्या अधिका-यांनी संयुक्तपणे पहाणी आयोजित करावी आणि अशा पहाणीत कोणतेही दोष आढळून आल्यास योजना ताब्यात देण्यापूर्वी ते सुधारण्यात यावेत.

४. सदर योजना राबविणे, त्याचे परिरक्षण, दुरुस्त्या (विशेष दुरुस्त्या धरुन) यावर दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी किंवा घसारा किंवा यंत्रसामुग्री नवी करण्याच्या निधीसाठी किंवा योजनांच्या खर्चातील लाभ

घेण्याचा हिस्सा सोसण्यासाठी येईल त्या खर्चाच्या व्यवस्थेसाठी जिल्हा परिषदेस किंवा ग्रामपंचायतीस शासनाकडून कोणतीही मदत मिळणार नाही. महाराष्ट्र ग्रामपंचायत कर व फी नियम, १९६० मधील तरतदींनुसार आकारण्यात येणा-या पाणीपट्टीच्या आधारे योजना स्वावलंबी ठरेल हे पाहण्याची जबाबदारी संबंधित ग्रामपंचायतीची / जिल्हा परिषदेची राहील. त्या अनुषंगाने या योजनेकरीता पाणीपट्टी ग्रामपंचायत आकारेल. ग्रामपंचायतीने तशा आशयाचा ठराव केल्याशिवाय योजनेची उर्वरीत कामे हाती घेवू नयेत.

५. सदर योजनेची उर्वरीत कामे तीन महिन्याच्या आत पूर्ण करण्यात यावीत.

६. या योजनेवर होणारा खर्च हा खर्च मागणी क्र. वाय- २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता ०१, पाणी पुरवठा १०२, ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम (बी) जिल्हा परिषदांना योजना अंतर्गत अनुदाने ४१ सहाय्यक अनुदान (एक) (डब्ल्यूएस-६) (राज्य क्षेत्र) या पाणी पुरवठा योजनांसाठी ग्रामपंचायती / जिल्हा परिषदांना अनुदाने (२२१५ १२१७) या अर्थसंकल्पीय शिर्षाखाली केलेल्या तरतुदीतुन भागविण्यात यावा.

७. हा शासन निर्णय नियोजन विभाग व वित्त विभागाच्या अनुक्रमे अनौपचारिक संदर्भ क्र. ४३/१४७३ दि. १७/३/२००९ व २२८/०९/व्यय-३ दि.७/८/२००९ अन्वये प्राप्त त्या विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक सांकेतांक २००९०८२९१३४६२७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

सोबत-प्रपत्र.

**(ज.र. गणेकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

विभागीय आयुक्त, नाशिक.
जिल्हाधिकारी, अहमदनगर
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अहमदनगर
सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नाशिक.
वित्तीय सल्लागार व मुख्या लेखाधिकारी, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नवी मुंबई.
महालेखापाल, लेखापरीक्षा, महाराष्ट्र १/ मुंबई .
अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (संकल्पचित्र व नियोजन विभाग,)सिडको भवन, नवी मुंबई.
अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, अहमदनगर
कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण बांधकाम विभाग, अहमदनगर
कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, अहमदनगर
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
निवासी लेखा व परिक्षा अधिकारी, मुंबई.
वित्त विभाग / नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.

मुख्य अभियंता तथा विशेष कार्य अधिकारी, यांचे स्वीय सहाय्यक पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय,
कार्यासन क्रमांक पापु-०४,०६,१०,१३,१७,१९, २० व संगणक कक्ष, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय,
निवडनस्ती कार्यासन पापु-०९.

**सहपत्र**

**शासन निर्णय क्र. ग्रापापु- २००८/प्र.क्र.११०/ पापु-०९ मंत्रालय, मुंबई-३२**
**दिनांक:- २९ ऑगस्ट २००९ सोबतचे प्रपत्र.**

**(रुपये लाखात)**

| **योजनेचे नांव** | **तालुका** | **जिल्हा** | **योजनेची मूळ मंजूर किंमत** | **योजनेचा मूळ मंजूर आदेश क्र व दिनांक** | **सुधारीत किंमत** | | **वाढीव किंमत** |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | **व.वे.का.** | **कि.ग.का.** | |
| **१** | **२** | **३** | **४** | **५** | **६** | **७** | **८** |
| गळनिंब, शिरसगां व व १८ गांवे प्रादेशिक पाणी पुरवठा योजना | नेवासा | अहमदनगर | अ) वर्धित वेग कार्यक्रम १३१९.३७ ब) किमान गरजा कार्यक्रम २३२.८५ | शासन निर्णय,पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,क्र.ववेका/ १०९८/सीआर/४३ ७(अ)/पापु- १०,दि.२.४.१९९८ | १३१९.३७ | ८८७.६२ | **६५४.७७** |
| **एकूण** | | | **१५५२.२२** | | **२२०६.९९** | | |

(ज.र.गणेकर)
कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन